ऊन तो **दोवर** शहरास निघोन गेला. त्या वेळस सर्व **युरोप** देशाचे लोक दोहीं कडची तयारी झाली या पासून पुढें काय होतें पहावें, असे उत्सुक झाले. तेव्हां असा प्रसंग आला होता कीं, त्या युद्धापासून धर्मपक्षाचा नाश व्हावा किंवा वृद्धि व्हावी. परंतु **फिलिप** आणि **जान** या दोघांतून एकास ही **पोपा** इतकें शहाणपण नव्हतें. त्या समयीं **पोपानें** अशी मसलत केली कीं, दोघांसही ठकवून आपलें काम साधावें. म्हणून त्याणें आपले वकीला बरोबर **जानास** सांगून पाठविलें कीं, तुला हें संकट प्राप्त झालें आहे या पासून मुक्त व्हायाच्या उपाय एकच; तो असा कीं, **पोपास** शरण जावें. मग तें ऐकोन **जानानें** शपथ घेतली कीं, **पोप** अशी आज्ञा करील त्या प्रमाणें मी चालेन. या रीतीनें, आज्ञा काय करणार ती राजास न कळवितां, त्या कडून शपथ घेववून, मग त्या युक्तिवान **पोपानें** कारभारी लोकांस असे मथविले, आणि राजास असें भय घातलें कीं, राजानें सर्व लोकांचे समक्ष

क्ष गुडघे टेंकून आपले हात पोपाचे आश्रिताचे होऊन धरवून चमत्कारीक शपथ घेतली. अशी गोष्ट घडलेली दुसरे कोठचे बखरेंत आढळत नाहीं. ती शपथ अशी.

"ईश्वरेच्छाकृत इंग्लंड देशाचा राजा, "आणि अयर्लंडाचा प्रभु मी ज़ान, आपली "पातक निवृत्ति व्हाया करितां, स्वेच्छेनें आणि स- "रदारांचे विचारानें, सर्व राज्याधिकार सुद्धां इं- "ग्लंडाचें राज्य, रूमाचे धर्मपक्षास म्हणजे "पोप इनोसेंट, आणि त्याचे पदवीवर पुढें जे "होतील त्यांस अर्पण करितों. आजपासून मी "पोपाचा सेवक भावें करून राज्य करीत आ- "ईन. मी ईश्वर आणि रूमच्या धर्मपक्ष म्ह- "णजे माझा प्रभु जो पोप तो, आणि त्याचे "स्थानीं पुढें जे होतील ते, त्यांजवळ विश्वासा- "नें वर्तेन. मी त्यांस दरवर्षास एक हजार मा- "र्क स्वामित्व देईन; त्यांत इंग्लंडाचे राज्या "करितां सातशें, आणि अयर्लंडा करितां ती- नशें.

नशें " या रीतीनें पोपास शरण आऊन, आणि लांग्‌तनाला आर्चबिशपाचे आगीं स्थापायाच्या करार करून, तो आपलें राज्य पावता झाला.

राजानें जो करभार देऊं केला होता तो, त्या पोपाच्या आश्रिताचे पायां पुढें नेऊन ओतला; तो त्याणें अंगीकारिला त्यासमयीं राजानें मुकुट धारण केला. अशा निंद्य रीतीने शरण जाऊन राजा आपल्यावर तोबत आली होती तीपासून सुटला; परंतु पुढें दुष्कर्मैं आणि निरुपयोगी साहसें केल्यामुळें तो सर्वांस अप्रिय झाला.

कारभारी त्याचा घात कराया विषयीं कांहीं बेत करायाचा मसलतींत बहुत दिवस होते; परंतु कितिएक विपरीत गोष्टी घडोन त्यांची मसलत सिद्धीस गेली नव्हती. शेवटीं ते बळानें चढून जाऊन स्ताम्‌फोर्ड शहरांत पुष्कळ लोक जमा करून तेथून ब्राक्ली शहरास निघाले

ले; तें शहर जा **आक्सफर्डांत** त्या वेळेस दरबार असे, तेथून सुमारें १५ मैल होतें. ते येतात असें ऐकून राजानें **क्यांतर्बरीचा आर्चबिशप, पेंब्रोकाचा अर्ल**, आणि दुसरे आपले मंत्री यांस त्यांकडे पाठवून, विचारिलें कीं, तुह्मी स्वतंत्रपणा जो मागतां तो आहे तरी काय तें सांगा? तेंव्हां त्याणीं आपले दाव्याचे कलमाची याद करून दिली. तीं कलमें **हेनरी** आणि **एड्वर्ड** यांचे राज्यांत जे नियम ठरले होते त्या प्रमाणें होतीं. ती याद पहातांच राजा अतिशय संतप्त होऊन बोलिला कीं, त्याणीं माझें राज्य कां मागीतलें नाहीं? आणि त्याणें शपथ केली कीं, असे अमार्गाचे प्रार्थनें विषयीं मी कधींही संमति देणार नाहीं. परंतु त्या वेळीं त्याचे शत्रूंचा पक्ष असा दृढ झाला होता कीं, त्यांस राजाचे क्रोधापासून कांहीं भय वाटलें नाहीं. मग त्याणीं **राबर्ट फिझ्वाल्टर** या नावाचा एक पुरुष आपला सेनापति केला; आणि त्यास "इश्वरी सैन्याचा आणि

पुण्यवंत

पुण्यवंत धर्मपक्षाचा सरदार " अशी पदवी देऊन राजाशीं युद्ध करायाचे बेतानें आऊन, **नर्थंपूटन** शहरास वेढा घातला **बेदूफ्रोर्ड** शहर घेतलें; आणि ते **लंडन** शहरास गेले; तेथे लोकांनी त्यांच्या संतोषानें आदर केला. जे कोणी अमात्य आणि दुसरे गृहस्थ त्यांचा पक्षास मिळाले नव्हते, त्यांस त्याणीं पत्रें लिहिलीं, आणि ज्याणीं नाहीं ह्मटलें किंवा कांहीं बयाद लाविली त्यांचीं घरें दारें लुटिलीं.

राजा **जान** हें पाहून भयभीत होत्साता, तो विषय **पोपानें** किंवा आठ सभासदानीं निवडावा; आणि त्या आठांत चार आपण नेमावे, आणि चार त्याणीं नेमावे, या गोष्टीस कबूल झाला. परंतु हें शत्रूंचा मनास येईना. मग राजानें त्यांस सांगून पाठविलें कीं, तुह्मी जें मागतां तें मी विचार करून संतोषानें देईन. या करितां सर्व योजना करून एक तहनामा तयार केला. **स्तेनूस** आणि **विंदसोर** या दोन शहरांचे मधली जमीन, जीस **रनिमीड** असें ह्मणतात, तेथें

सभासदां-

सभासदांस राजाचा वकीलानीं येऊन भेटावें असें ठरविलें. तेथें प्रथम स्वतंत्रतेचा झेंडा पुरला, म्हणून त्या जमिनीस लोक आजून भक्तीनें मानितात. त्या ठिकाणीं ते सभासद पुष्कळ नैट आणि योद्धे घेऊन सन १२१५ चे सालीं जून महिन्याचे १५ तारिखेस आऊन राहिले. मग दोन दिवसानीं मागून राजाचे वकील आऊन पोहोंचले. दोनही पक्षांचा युद्धा सारिखा तळ पडला. ते सभासद कसा तरी आपला मतलब सिद्धीस जावा असें इछित होते, म्हणून कांहींच तोड ऐकेनांत; आणि राजाचे वकीलांसही आंतोन त्यांचा पक्षाचा अभिमान होता, म्हणोन त्या दोघामध्यें विशेष तंटा पडला नाहीं. शेवटीं त्या दोघांनीं एक नियमपत्र केलें. कांहीं दिवसांनीं राजानें त्यावर सही करून आपली मोहर केली. तो नियम अद्यापि यथास्थित चालतो आहे; जो इंग्लिशांचे स्वतंत्रतेचा आदिकारणीभूत, माग्ना कार्टा या नावानें प्रसिद्ध आहे. हा

करार

करार मोठ्या आग्रहानें ठरला; परंतु यापासून जे मुळचेच स्वतंत्र होते त्यांस मात्र नवी स्वतंत्रता प्राप्त झाली; ह्मणजे धर्माध्यक्ष, सभासद, आणि प्रतिष्ठित गृहस्थ यांस मात्र; किंवा त्यांची त्यांजवळ काईम झाली असें ह्मणावें. इतर जे गरीब वगैरे होते. त्यांस तर तेव्हां ही राजसेवकपणापेक्षें विशेष कांहीं प्राप्त झालें नाहीं. पुढें पुष्कळ काळानंतर ते स्वतंत्र झाले.

त्या नियमानें आपल्या आचरणास किमपि प्रतिबंध होऊं नये या विषयीं राजा **जान** प्रथम उद्योग करूं लागला. या मुळें आंतले आंत दुसरी लढाई उत्पन्न झाली; त्या वेळेस सभासद **फ्रानूस** देशाचे राजाजवळ साहाय्य मागाया करितां गेले. या रीतीनें **इंग्लंड** देश दोहींकडून विपत्तींत पडायाचा समय आला. तो असा कीं, जर **जानाचा** विजय झाला, तर दुरात्मा आणि क्रूर अशा राजापासून जन्मवर दुःख भोगिलें पाहिजे; आणि जर **फ्रेंच** राजा जिंक-

ला

ला तर देश, त्या बळकट राजाचे स्वाधीन होऊन **फ्रान्स** देशाचे ताबेंत यावें लागेल. अशी संकट अवस्था प्राप्त झाली असतां, जें मनुष्याचे बुद्धीस सुचायाचें किंवा समजायाचें नाहीं, तें अकस्मात् घडून सर्वांचें कल्याण झालें.

तें असें. **जान** राजानें राज्य घेण्या करितां शेवटची एक लढाई मारावी म्हणून पुष्कळ फौज जमविली होती; आणि त्यांतून बहुत योद्धे घेऊन राज्याचे आंत प्रवेश करायाची मसलत केली. तो याचे बेतानें **लिन्न** शहरांतून निघोन **लिंकन** प्रांताकडे चालिला. **लिन्न** शहरचे लोकांवर त्याणें उपकार करून तें वाढविलें होतें. तो जात होता ती वाट समुद्र कांठानें होती. तेथें भरती आली. हें न समजून किंवा त्या ठिकाणीं भरती केव्हां येते हें न कळल्या मुळें, त्या पाण्यांतून जात असतां त्याचा गाड्या, पैका, आणि सामान सुमान सर्व वाहोन गेलें. राजा स्वतः मात्र मोठ्या संकटानें निभावोन **स्विन्स्तेद**

शहरचे

शहरचे मठांत येऊन राहिला. तेथें आपला नाश झाला, आणि आपल्यास विपत्ति प्राप्ति झाली, हें दुःख वारंवार मनांत आणिल्यामुळें त्यास ताप येऊं लागला. दुसरे दिवशीं त्यास घोड्यावर बसायाची शक्ति राहिली नाहीं ह्मणून, पालखींत बसवून **सिफर्डाचे** किल्यांत नेला; तेथून **न्युआर्कांत** पोहोंचविला; तेथें तो आपलें मृत्युपत्र करून मरण पावता झाला. त्या वेळेस त्याचे वयास एकावन्नावें वर्ष होतें. त्याणें अठरा वर्षें पर्यंत निंद्य रीतीनें राज्य केलें.

# प्रकरण ११

## तृतीय हेनरी राजाची कथा

## सन १२१६ पासून १२७२ पर्यंत



जान राजा मरण पावल्या नंतर, त्याचा पुत्र नऊ वर्षांचा हेनरी नामें होता, त्यास राज्यपदावर बसवावा अशी मसलत झाली. पेंब्रोकाचा अर्ल जाणें जान राजाची मोठ्या विश्वासानें सेवा केली होती, त्याणें त्यास विंचेस्तर आणि बाथ या शहरचे धर्मोध्यक्षां करवीं ग्लौसेस्तर शहरांत राज्याभिषेक करविला. या मुलाचा स्वभाव बापाशीं केवळ विपरीत होता. तो तारुण्यांत आला त्या वेळेस दयाळूमायाळू असा होता, सेवकांवर ममता करी; आणि शत्रूंस किमपि त्रास देत नसें. तो युद्धोपयोगी नव्हता; कारण

त्या

त्या मध्यें उद्योग आणि शौर्य हीं नव्हतीं; आणि त्यास लोक पुष्कळ ठकवीत; कां कीं, त्या मध्यें अविश्वास किंवा शंका हीं नव्हतीं.

भोळ्या राजां जवळ बहुधा खुशामती लोक असतात; ते सांगतील तें राजे ऐकतात. यारीतीनें हेनरी राजा प्रथम ह्युबर्ट डिबर्ग या नावाचा एक पुरुष होता, त्यावर प्रीति करूं लागला; त्यानंतर त्याचे ठिकाणीं विंचेस्तर शहराचा धर्माध्यक्ष पीटरडेरोश होता त्यावर ममता बसली तो मुळचा पाइटियर्स् शहरांतला रहाणारा. त्याची शौर्याविषयीं, आणि बुद्धी विषयीं कीर्ति असे. त्याची मसलत ऐकून हेनरी राजानें पाइटियर्स् शहरांतले, तसेच दुसरे बाहेरचे लोक बोलावून आणून आपले जवळ ठेविले. ते राजाचे मर्जीप्रमाणें वागूं लागले. मग सर्व पदव्या तशींच मोटमोटीं संस्थानें, त्या अज्ञानी लोकांस दिलीं. ते लोभी, गर्विष्ठ आणि दांडगे होते. असा राजास अयोग्य पक्षपात पाहून सभासदां-

स

स द्वेष उत्पन्न झाला; आणि त्यांणीं राजास कळविलें कीं, हे परकी आले आहेत यांस जर तूं आपल्या राज्यांतून काढून टाकणार नाहींस, तर त्यांला आणि तुला आह्मी मुलखांतून बाहेर लावून देऊं. त्यांचा क्रोध नुकताच कमी होत होता, इतक्यांत दुसरी एक त्या परदेशांची टोळी गास्कनी[1] प्रांतांतून आली. राजाचा उधळेपणाविषयीं लोक अगोदरच कुरकुरत होते, आणि मग राजानें कितिएक महाद्वीपांत लढाया आरंभिल्या, त्यांत त्याचा पराजय झाला, त्या मुळें लोकांचा द्वेष अधिकच वाढला. शेवटीं राज्य त्या अशक्त राजापासून सोडवायाकरितां **सैमन मांतेफर्ड, लेसेस्तराचा अर्ल,** राज्य रीतींत फेरफार करायाचा उद्योग करूं लागला. या गृहस्थाचा बाप **आल्बिजेन्सी**[2] लोकांशीं युद्ध झालें त्या वेळेस सैन्याचा सरदार होता; जा

१ गास्कनी ह्मणून फ्रान्स देशाचा एक प्रांत आहे.

२ आल्बिजेन्सी ह्मणून त्या काळीं एके मताचे लोक होते.

लोकांनीं

लोकानीं रोमन धर्म सोडिला, ह्मणून पूर्वीं त्यांच्या सेवाय मुलखांत मोठा नाश झाला होता. त्या अर्लास राजाची बहीण दिली होती. त्याचे पराक्रमानें आणि सुवृत्तानें त्यास प्रजा अनुकूल होत्या.

त्याणें मोठें बंड केलें, तें प्रथम पार्लमेंटाचे*

---

* पूर्वीं सांगीतलें आहे कीं, इंग्लंड देशाच्या राज्य कारभार तिघांचे संमत्तानें होतो. त्यांत एक राजा, दुसरे राज्यांतील वंशपरंपरागत सभासद ह्मणजे ड्यूक, मार्कुइस, अर्ल, इत्यादिक, आणि मुख्य धर्माध्यक्ष; आणि तिसरे प्रजांचे प्रतिनिधि. प्रतिनिधि शब्दाचा अर्थ एकानें जें कार्य करावयाचें तें करणारा जो कोणी तो. हे प्रतिनिधि दर प्रांतांतून, दोन दोन, व दर बरोंतून दोन असे येतात. यांची सभा राजाचे मर्जीस येईल तेव्हां होते, व यांस निरोप देण्यासही राजास अधिकार आहे. सभासद जेथे बसून विचार करितात, त्या घरांचें नाव लार्डांची सभा; आणि प्रतिनिधि बसतात त्याचें प्रतिनिधिसभा असें ठेविलें आहे. प्रथमचे सभेंतील लोकांची संख्या नियमित नाहीं, परंतु प्रतिनिधिसभेंत सुमारें ६०० असतात. सर्व विषयांचा विचार या दोन सभांत पुरतेपणी होऊन राजास संमत झाला ह्मणजे तो राज्यांत

सभेंत प्रकट झालें. तेथें सभासद युद्धाचा वेष करून गेले होते. मग राजा तेथें गेला तेव्हां त्याणें विचारिलें कीं, तुमचे मनांत काय आहे ? त्यावर त्याणीं नम्रतेनें उत्तर केलें कीं, आह्मी जीं दुःखें भोगितों तीं आपण दूर करावीं; मग सुखानें राज्य कारभार चालवावा, असें आमचे मनांत आहे. राजा जें कोणी मागेल तें होय ह्मणत असेच त्याणें सांगीतलें कीं, चिंता नाहीं, तुमचें जा रीतीनें कल्याण होईल, त्या रीतीनें मी वर्तेन. त्या नंतर राज्य रीति कशी असावी, आणि मुख्य मुख्य कारभारांवर कोण कोण गृहस्थ नेमावे, हा विचार कराया करितां राजानें **आक्सफर्ड** शहरांत **पार्लमेंटाची** सभा केली. तेथें पूर्वींचे राजनियम नूतन कराया विषयीं उद्योग चालिला; त्या वेळेस सर्व अखत्यार त्यांकडे देऊन चोवीस सभासद नेमिले. त्याणीं पूर्वीं जो काय राज्यांत बखेडा झाला असेल, तो पाहून

---

चालतो. त्यास राज्यनियम, राज्यकायदा असें ह्मटलें आहे. या तिहींचें मिळोन एक नाव **पार्लमेंट.**

नी

नीट करावा असें ठरविलें. लेसेस्तर त्यांमध्यें मुख्य केला. त्यांचा कारभारानें सर्व राज्य विपरीतच हो- ऊन गेलें. राजाचे जुने कारभारी पदच्युत झाले; आणि त्यांचे स्थानीं हे आपण काम करूं लागले. त्याणीं राजाचीच सत्ता कमी केली असें नाहीं; तर एका एंका सेशनाचे वेळेस ह्मणजे पार्लमेंटाची सभा होते त्या वेळेस, सर्व पार्लमेंटाच्या अखत्या- र बारबारा गृहस्थांस देऊन, पार्लमेंटाचा ही उ- पयोग नाहींसा केला.

नंतर राज्यांत जांच्या नुकसानीचा अंमल चढत चालिला होता, अशां पासूनच प्रथम या अन्या यां- चा बंदोबस्त झाला. हें करणारे लोक प्रांतांतले नै- ट. ते दुसऱ्या एक वेगळ्याच वाड्यांत पूर्वी कांहीं दिवस बसत असत. ते ह्मणूं लागले कीं, जे कारभा- री कायदे करितात, त्यां पासून त्यांची मात्र सत्ता आणि हितहीं वाढतात; पुढें त्या नैटानीं राजा- चा पुत्र एड्वर्ड होता, त्या जवळ बोलणें लाविलें कीं, तूं तरी राज्य बुडतें हें आपले सामर्थ्यानें राख.

त्या

त्या वेळेस राजपुत्र एड्वर्डाचें वय बावीस वर्षा-च्यें होतें. त्या मध्यें सामर्थ्य, आणि सद्गुण असे होते कीं, त्यावरून तो राज्य कारभार मोठ्या विचक्षणते-नें करील, आणि पुढें काहीं तरी मोठा पराक्रम करू-नं आपले बापाच्या भ्याडपणा मागें पाडील, असा लोकांचा निश्चय झाला होता. त्याणें लहानपणींच शौर्य, चतुरपणा, आणि स्थिर बुद्धि, यांची प्रचीति दाखविली. पहिल्यानें लोकांनीं त्याची प्रार्थना केली, तेव्हां तो मनांत आणीना; शेवटीं आपण संमति द्यावी असें याचे मनांत आलें. मग आणखी एक वेळ पार्लमेंटास बोलावणें केलें आणि राजा पूर्ववत् आपला अंमल दाखवूं लागला. या कारणामुळें दुसरी एक आंतले आंत लढाई उत्पन्न झाली; ती मध्यें लेसेस्तरानें विजय मेळविला. त्या वेळीं राजा कैदेंत पडला. थोडे दिवसांनंतर त्या लेसेस्तरानें एड्वर्डास ओलीस घेऊन राजास सोडिला.

अशा सर्व गोष्टी अनुकूळ होत्या तरी, ले-

स्तराचा ड्युक आपला पक्ष घेऊन युद्ध करायास सिद्ध आहे. मग चौकी पहारा होता त्यापासून सुटून त्या ड्युका जवळ जाऊन, तत्पक्षी लोकांचें मुख्यत्व स्वीकारिता झाला. त्या नंतर लेसेस्तर आणि राजपुत्र या दोघांमध्यें युद्ध झालें; त्यांत लेसेस्तराची फौज वेल्स प्रांताचे डोंगरावर दुष्काळानें दुर्बळ झाल्यामुळें एड्वर्ड राजाच्या प्रबळ हल्ला सहन करायास समर्थ झाली नाहीं. राजपुत्रानें ती लढाई मोठ्या निकरानें केली. त्या भयंकर दिवशीं लेसेस्तरानें मोठें शौर्य दाखविलें; आणि दोन प्रहर दिवसापासून आठ घटिका रात्र पर्यंत एक सारिखा युद्धाचा आवेश धरिला. शेवटीं तो ज्यावर बसला होता, तो घोडा मेल्यामुळें, त्यास पायीं लढाई करायाचा प्रसंग आला. त्या वेळेस त्याणें क्षमा मागीतली; परंतु त्यास शत्रूंनीं सोडिला नाहीं. त्या काळीं लोक असंख्य दुराले असत. म्हातारा हेनरी राजा लढाईंत पुढें होता; त्यास खांद्यावर वार लागला. तें त्याचे लोकांस समजलें

नाहीं

नाहीं, त्यामुळें एक शिपाई त्यास ठार मारायाचा बेतांत होता; इतक्यांत तो मोठ्यानें ओरडला कीं "मी विंचेस्तरचा हेनरी राजा आहे." हे शब्द ऐकून त्याचे सेनेंतले एके नैटानें जाऊन त्यास वांचविला. राजपुत्रही आपल्या बापाचा स्वर ऐकतांच तो होता तेथें गेला, आणि त्यास निर्भय अशे ठिकाणीं नेऊन ठेविता झाला. लेसेस्तराचें शरीर जमीनें पडलीं होतीं त्यांत सांपडलें. तें राजर मार्टिमर म्हणून परम दुष्ट पुरुष होता त्याणें फाडिलें; आणि मोठे उत्साहानें राजाचे विजयाचें चिन्ह असें करून, तें त्याचे बायकोजवळ पाठवून दिलें.

राजपुत्र या रीतीनें निर्बाध जय पावोन प्रजांस सुखी करिता झाला. त्या काळीं आपलें राज्य केवळ निर्भय झालें पाहून, त्याणें धर्मयुद्धास जायाचा बेत आरंभिला. हें कर्म तेव्हां सर्वलोकांस मोटें प्रार्थनीय असे. हा विचार मनांत दृढ करून ट्यूनिस शहराजवळ फ्रान्स देशाचो

चा राजा लुइस सैन्य घेऊन होता, तेथें आयाक-
रितां राजपुत्र पुष्कळ फौज जमवून गलबतांत
बसून निघाला; परंतु तेथें पोंचायाचे पूर्वींच तो ध-
र्मोला लुइस राजा मृत्यु पावला, अशी बातमी
त्याणें ऐकिली. असें असतां ही एड्वर्ड राजा पुढें
जाऊन खुशालपणीं पुण्यभूमीस पोंहोंचला. तो
इंग्लंड देशांतून निघोन गेल्यावर, मागें लाग-
लींच वृद्ध राजाची शरीरप्रकृति क्षीण होत चा-
लिली, त्या हेनरी राजानें आउली, आणि राज्याची
शक्ति या दोनही कमी होत चालल्या असें पाहून
पुत्रास लागलेंच निघोन यावें, ह्मणून पत्रें पाठवि-
लीं. शेवटीं त्याणें राज्याची खबरदारी करणें, आ-
णि वार्धक्यामुळें झालेली अशक्तता, याहीं करून
त्रास पावून आपल्यास लहान लहान मजला करू-
न सेंटएड्वर्ड स्थळापासून वेस्तमिनस्तरास
पोंचवायाचा हुकुम केला. तेथें तो पोंहोंचला त्या-
च रात्रीं मरण पावला. त्यावेळेस त्याचे वयास
चौसष्ट वर्षें होतीं. त्याणें राज्य छपन्न वर्षे केलें; इ-

नकें

तर्के कोणी दुसऱ्या राजानें केलें असें इंग्लंड देशाचे बखरींत नाहीं.

---

## प्रकरण १२

### प्रथम एडवर्ड राजाची कथा

### सन १२७२ पासून १३०७ पर्यंत

हेनरी राजा आपण मरायाचे पूर्वीं प्रजांस वश करायाविषयीं निरर्थक यत्न करीत असतां राज्याच्या पुढील अधिकारी जो त्याचा पुत्र एडवर्ड तो पुण्य युद्धांत गुंतला होता. तेथें त्याणें इंग्लिश यानावास प्रतिष्ठा मेळविली; आणि जे क्रिस्तियन धर्माशीं विरुद्ध होते, त्यांस भयभीत केलें. तो एका

के दिवशीं आपले रावटींत बसला होता; इतक्यांत कोणी एक मुसलमान आसासीनानें[1] येऊन त्यावर वार केला. तो बराह्यायास मोटें संकट पडलें. कितिएक असें ह्मणतात कीं, त्याची राणी एलिनोरा होती तिणें आपल्या जीवाची आशा सोडून, त्या घायांतून विष चोंखून घेऊन राजास वांचविलें.

एड्वर्ड राजास निर्विवाद पणें करून राज्य प्राप्त झालें, ह्मणून प्रतिकूळ पक्ष कमी होत चाललें. सभासदांचें बहुत दिवस आंतले आंत वांकडें होतें; परंतु सर्वांची या गोष्टी विषयीं मात्र संमति असे कीं, पोपाचा मान राखूं नये; कारण तो त्यास किति दिवस पर्यंत दुःख देत असे. लोकही मठांत बहुत दंगा करीत, त्या वरून त्यांची धर्मपक्षपात्यांवर अप्रीति असे दिसून येई; परंतु हे सर्व परस्पर विरुद्धमताचे एकएकाविचारास मान्य होते. तो हा

१ आसासीन ह्मणून एक मुसलमान लोकांत त्या वेळेस जात असे.

कीं

कीं, सर्वांनीं राजाचा मान राखून त्याची आज्ञा मानावी. अशी लोकांची आपणावर प्रीति पाहून एडुर्ड राजाचे मनांत **इंग्लंड** आणि **वेल्स** हे दोन प्रांत एकत्र करावे असा बेत आला. **वेल्स** प्रांतांतील लोकांस **वेल्श** असें ह्मणतात. त्या मध्यें त्यांचेच जुने नियम, चाली, भाषा, आणि मतें हीं चालिलीं होतीं. ते पुरातन **ब्रिटन** लोकांचे आतीचे. मध्यें **रोमनाचा** आणि **साक्सनाचा** दंगा झाला त्यांतून चुकून, ते बाहेरचे प्रभूचे अमला खालीं न राहतां, आपली स्वतंत्रता आणि देश हीं रक्षून होते. त्यांची संख्या थोडी, या मुळें आपले शिमशेजारी शत्रूंशीं मैदानांत लढाई करायास ते समर्थ नव्हते. ह्मणून ते वर चढायाचा उपाय नाहीं, अशा उंच पर्वतांचा बहुधा आश्रय करून असत. ते पर्वत त्या काळीं देशाचे स्वाभाविक रक्षक झाले. जेव्हां **इंग्लंडांत** आंतले आंत फूट पडे, किंवा फौज युद्धा करितां बाहेर जाई, त्या वेळेस **वेल्श** लोक आपली अव्यवस्थित फौज घेऊन

यत.

येत, आणि देशाचा नाश करीत. राज्या सभोंवतीं पुष्क- ळ वेगळीं आणि परस्परांशीं विरुद्ध अशीं संस्थानें असा- वीं या सारिखें दुसरें कठीण नाहीं, या कारणामुळें **एड्वर्ड** राजाचे मनांत ही गोष्ट फार दिवस होती कीं, ते लोक आपले ताबेखालीं आणावे. ह्मणून त्याणें तेथील **लुइलेन** नामें राजा होता, त्यास ये- थें येऊन विश्वासाची शपथ घे ह्मणून आज्ञा के- ली. ती त्या राजानें मानिली नाहीं, आणि सांगू- न पाठविलें कीं, मला तुह्मीं निर्भयपणें परत सोडून द्याल याविषयीं तुमचा मुलगा ओलीस दिला तर मी येईन. हा निरोप ऐकून राजास वाईट वाटलें ना- हीं; कारण कीं, त्यास त्यावर हल्ला करायास आय- तें निमित्त सांपडलें. मग तो फौज तयार करून **लुइलेन** राजाचा राज्यांत मोठ्या शौर्यानें गेला.

**एड्वर्ड** राजा आला असें समजतांच, **वेल्- श** राजा **स्नोडनाचे** उंच डोंगरावर पळून गेला; आणि लढाई न करितां तेथेंच निर्भयपणें दडून रहावें असा निश्चय करिता झाला. त्या पर्वतानें

बहुत काळ पर्यंत त्या राजाचा पूर्वजांस **साक्सन** आणि **नार्मेन** लोकांपासून संरक्षिलें होतें; परंतु **एड्वर्ड** राजा शूर, आणि मसलतीही तसाच; ह्मणून त्याणें युक्तीनें मार्गाचा शोध लावून **लुइलेना**च्या राज्याचे मध्यापर्यंत आऊन, त्याची फौज जेथें पळाली होती तेथें प्रवेश केला. मग **लुइलेन** राजा त्यास शरण जाऊन स्वस्थानीं गेला. पुढें **मर्लिन** ह्मणून कोणी कवि होता, त्याणें असें भविष्य केलें कीं, **ब्रुटस**ाचें राज्य **ब्रिटेन** देशांत होतें तसें **लुइलेन** राजा पुनः करील; या वरून त्या राजानें पुनः एकवेळ **इंग्लिशांशीं** युद्ध करायाचा उद्योग केला; आणि फौज घेऊन **राड्नर** प्रांतांत गेला. तथें **वे** ह्मणून नदी आहे ती उतरून त्याचें सैन्य जात होतें, आणि राजा त्या प्रांतांतले अमात्यांशीं मसलत करायास गेला होता; इतक्यांत **एड्वर्ड मार्तिमर** या नावाचे, **इंग्लिश** सरदारानें अकस्मात् येऊन त्या लोकांचा पराजय केला. **लुइलेन** राजा परत आल्यानंतर संतापानें शत्रूं-

चा

चा फौजेंत शिरला. तेव्हां, ज्या मृत्युकरितां त्याणें इतका उद्योग केला होता, तो त्यास तत्क्षणीं प्राप्त झाला. त्या हतभाग्य राजाचा भाऊ **डेविड** होता त्याचीही समाप्ति त्याच उद्योगांत झाली; आणि त्या बरोबर **वेल्स** देशाचें राज्य, तसाच त्याचा आणि **इंग्लंड** देशाचा भेद, यांचा दोहोंचा नाश झाला. थोडे दिवसांनंतर तो **वेल्स** देश **इंग्लंडाचे** राज्यास मेळविला, आणि तो पर्गणा राजाचा वडील पुत्र असेल त्यास द्यावा असें ठरविलें. बाहेरचे देशांत विजय होतो, त्यापासून यशाचा मात्र लाभ; परंतु या जयापासून राज्याचें कल्याणही झालें. त्या नंतर **वेल्स** देशाचे लोकांत **इंग्लिश** मिसळूं लागले; आणि कांहीं वर्षांनंतर पूर्वींचा जो परस्पराशीं द्वेष होता तो सर्व उभयतां विसरले.

नंतर **स्काटलंड** देशाची **मार्गारेट** म्हणून राणी होती ती मेली; तेव्हां **एडुर्ड** राजास तो हीदेश आपले राज्यांत आणावा अशी इच्छा उत्प-

न्न

न झाली. त्या राणीच्या मृत्यूनंतर तेथील राजास-नाचा अधिकाराविषयीं फार कज्जे लागले. त्या राज्याविषयीं स्पर्धा करणारे आसामी बारा होते. शेवटीं बारांचे तिहींवर आले; ते तीन **हंतिंगड्नाचे अर्लीचा** तिघे मुलींकडचे वंशांतले होते. त्यांत **जान् हेस्तिंगूस** ह्मणून एकीचा मुलगा; तो आपले आईस राज्याधिकाराचा विभाग होता ह्मणोन राज्य माझें असें ह्मणे; दुसरा **जानबेलियल** तो आपण वडील मुलीचा नातू ह्मणोन भांडे; तिसरा **राबर्टब्रूस** तो दुसऱ्या मुलीचा औरस मुलगा ह्मणून सत्ता करी. हा कज्जा निवडायास **एड्वर्ड** जवळ गेला; तेव्हां त्याणें मोठ्या धारिष्टानें असा निवाडा केला कीं, राज्य सर्व माझें आहे; आतां माझा प्रतिनिधि मी **बेलियलास** करितों; त्याणें माझे आज्ञेनें कारभार चालवावा- या रीतीनें **एड्वर्डानें** राजपद कोणास न देतां **बेलियलास** सेवक रूपानें राज्यावर स्थापिला.

साधारण लोकांस प्राप्त होऊं लागलें, आणि ते मातबर झाले; ह्मणून कांहीं पैका उत्पन्न करायास त्यांची ही संमति अवश्य लागों लागली. या कारणा करितां त्याणें शरिफांस हुकुम पाठविले कीं, पूर्वींचे राज्यांत जसे एकेक प्रांतांतून दोन नैट येत होते, तसे पाठवावे; आणि रवी त्या प्रांतांतले एकेका बरोंतून दोन दोन प्रतिनिधि पाठवावे. पार्लमेंटानें माग्नाकार्टा ह्मणून जो पूर्वीं सांगीतला नियम त्यावर राजाचे मंत्र्यांचा सह्या घ्यायाचा उद्योग प्रथम केला, आणि एक कलम अधिक चढविलें; तें असें कीं, पार्लमेंटाचे संमतीवांचून प्रजांवर कोणताही कर किंवा कानु बसवूं नये. एड्वर्ड राजा त्या काळीं फ्लांडर्स देशांत होता. त्याचे मंत्र्यांनी त्यावर लागल्याच सह्या केल्या; आणि तें राजाजवळ पाठविलें, तेह्मां त्याणेंही कांहींसा अनमान करून त्यावर आपली संमति केली. नंतर तो जेह्मां स्वदेशीं आला, तेह्मां त्याणें

णें जीं सर्व कलमें होतीं तीं चालवून तो नियम दृढ केला. या रीतीनें नियमाविषयीं सुमारें शंभर वर्षों पर्यंत वाद विवाद होऊन शेवटीं तो दृढ झाला; आणि इंग्लिशां मध्यें परम शूर आणि महान असा जो राजा, त्याणें तो स्थिर केला हें त्या नियमास साधन मोटें झालें.

त्या समयीं **स्काट्लंड** देशाचे बरवरींन महा प्रसिद्ध असा जो **विलियम वालेस** म्हणून होता त्याणें आपला देश **इंग्लिशां** पासून सोडवायाचा यत्न आरंभिला. त्या राज्याचे पश्चिम प्रांतीं कोणी एक गृहस्थ रहात असे, त्याचा तो मुलगा. त्याचें शरीर भयंकर, सामर्थ्य अत्यद्भुत, आणि शौर्य विलक्षण असे. त्यास स्वतंत्रतेची मोठी आवड; तो पक्षपात रहित होता, आणि आपल्या देशाचें कल्याण इच्छित असे. जे **इंग्लिशांचे** दरबारांत फजीत होऊन निघाले होते, ते सर्व जाऊन त्यास मिळाले. ज्यांचा स्वतः विपत्तींत आणि संकटांतच जन्म, असे जे कोणी

अभिमानी

अभिमानी, धीर, अपराधी, लोभी पुरुष होते तेही त्या वालेसाचें आश्चर्य करीत कीं, कशीं ही संकटें प्राप्त झालीं असतां हा धीर सोडीत नाहीं. त्यांसही गोष्ट मनुष्यास परम अशक्य वाटत असे – या रीतीनें तो त्यांचे प्रीतीचा आणि भक्तीचा मुख्य विषय झाला. अशी तयारी करून त्याणें प्रथम लुटी, तसेच चोरून इंग्लिशांवर हल्ले, यांचा प्रारंभ केला; पुढें मग तो लढाया करून इंग्लिशांचे फौजेचा पराजय करून त्यांचे सरदार मारूं लागला.

जेव्हां या गोष्टी घडल्या तेव्हां एड्वर्ड राजा फ्लांडर्स देशांत होता; तो हें ऐकून आपलें राज्याचें संरक्षण करायाकरितां मोठ्या त्वरेनें स्वदेशीं निघोन आला. नंतर एक लक्ष फौज जमा करून स्काच लोक अगदीं जमिनीस मिळवावे या आवेशानें उत्तरेस निघाला. त्याची आणि त्यांची फालकर्क शहरांत लढाई झाली. त्या लढाईंत स्काच लोक बारा

हजार

हजार पडले;(कितिएक म्हणतात पन्नास हजार) परंतु **इंग्लिशांचे** शंभर ही मेले नाहीं. या रीतीनें राजा **एडवर्ड.** विजयी होत्साता परत येता झाला.

मग थोडे दिवस गेल्यानंतर **स्काच** लोक पुनः उद्योग करूं लागले. जा **वालेसानें** आपले शौर्यानें त्यांची प्रीति संपादन केली होती, त्याणें आपले श्रमाचें फळ सोडून दिलें; आणि आपली विशेष योग्यता प्रगट केली. तें असें; सरदार लोक आपला मत्सर करितात, तेणें करून देशाचें फार अकल्याण होईल, असा विचार करून त्याणें आपलें मुख्य पद स्वेछेनें सोडिलें. त्याणें त्यास्थानीं **कमिन** या नावाचा पुरुष स्थापिला. तोही आपले थोरपणाची मर्चीत दाखवूं लागला. त्याणें शत्रूंचा पराजय केला; आणि पुढें तो शत्रूं पासून अपले राज्याचें संरक्षण करावें हें थाडें वाटून दक्षिणेचे बाजूस येऊन दंगे करूं लागला; जी

बाजू केवळ आपले स्वाधीन आहे असा **एडूर्ड** राजाचा समज होता. तिकडे येऊन **इंग्लिशांची** फौज **एदिंबर्ग** शहराजवळ **रास्लिन** गावांत होती तिजवर **स्काच** लोकांनीं हल्ला करून तिचा पराजय केला.

परंतु कसाही संकटसमय आला तरी, राजा **एडूर्डाचें** साहस असें होतें कीं, त्यास भय प्राप्त होऊं नये. तो लागलीच मोठी फौज आणि पुष्कळ गलबतें जमवून, **स्काट्लंड** देशाचे सीमेवर जाऊन पोहोंचला. तेथे त्याची फौज पाहून शत्रू युद्धा विषयीं निराश झाले. मग तो राजा आपले उद्योगाचे सिद्धी विषयीं खातर बाळगून देश लुटीत लुटीत, किल्ले घेत. आणि सगळे सरदार लोक स्वाधीन करीत, एक सीमेपासून दुसऱ्या सीमे पर्यंत जाता झाला. तथापि **स्काच** लोकांचें राज्य अगदीं नाहींसें करायास एक विघ्न राहिलें होतें; तें हें कीं, **विलियम वालेसाचा** मनांतून द्वेष गेला नव्हता

क्षता, आणि तो थोडेशे फौजेनिशीं डोंगरोडोंगरीं फिरोन आपली स्वतंत्रता आणि डौल राखीत होता. शेवटीं त्यावर **स्काच** लोकांनीं आशा ठेविल्या त्याही व्यर्थ गेल्या. तें वर्तमान असें. **वालेसाचा सरजान मांटीथ** या नावाचा मोठा विश्वासू स्नेही होता; त्याणें फितूर होऊन त्यास धरून **एडुर्ड** राजा जवळ दिला. राजाचा मनांत आलें कीं, त्याचे हाल करून **स्काच** लोकांचा मनांत भयउत्पन्न करावें; ह्मणून त्याणें त्यास बिड्या घालून **लंडन** शहरांत नेऊन फाशीं दिला; आणि त्याचें शरीर कापून तुकडे तुकडे केले.

**राबर्ट ब्रूस** राज्याविषयीं पूर्वीं सत्ता करीत होता, त्यास धरून **लंडनांत** कैदेंत ठेविला. तो तेथेंच फार दिवस पर्यंत होता: शेवटीं कैदेंतून सुटोन आपले देशाचे स्वतंत्रते विषयीं उद्योग करायाचा निश्चय करिता झाला. त्याणें प्रथमच राजाचा एक चाकर मारून दुरात्मते-

च्या झेंडा लाविला; मग आपलें संरक्षण कराया-
च्या उपाय एक शौर्यावांचून दुसरा राहिला ना-
हीं, असें जाणून त्याणें आपले राज्यांत **इंग्लि-
शांची** फौज येऊन राहिली होती, ती काढून दि-
ली. थोडे दिवसांनंतर त्यास **स्कोन** शहरचे म-
ग्रांत **सेंट आंद्रूस** गावांतले धर्माध्यक्षानें रा-
ज्याभिषेक केला; तेव्हां त्याचा अधिकाराचे पुष्टीक-
रणार्थ बहुत लोक त्याचे जरीपटक्याजवळ जमा
झाले. याच्या पूर्वी **एड्वर्ड** राजानें तें राज्य दोनवळ घे-
तलें होतें, आणि दोनही वेळ जे अन्यायी ठरले त्यां-
स क्षमा केली होती; परंतु या शेवटचे वेळेस ध्यानां-
त आलें कीं, जर लोकांचा संपूर्ण नाश केला तरमा-
त्र आपल्यास स्वस्थता प्राप्त होईल. ह्मणून त्या
सर्व राज्यावर संतप्त होऊन त्याणें प्रतिज्ञा केली
कीं, सर्व लोक माझे केवळ सेवकभावांत येतील,
तेव्हां माझा कोप उपशम पावेल. नंतर त्याणें ध-
र्माध्यक्ष आणि आपले सरदार यांस बोलावून आ-
णून हुकूम केला कीं, तुह्मी मला **क्यार्लैल** श-

हरांत

हरांत येऊन भेटावें. आणि तेव्हांच त्याणें आपला सरदार एमडी वालान्स् त्याज बरोबर फौजेची एक टोळी देऊन आपले पुढें स्काट्लंडांत पाठविला. त्या सरदारानें पर्थ प्रांतांत मेथुइन गावांत ब्रूसाच्या पराजय केला. नंतर तो परम कोपिष्ठ राजा एड्वर्ड आपले फौजेचे दोन विभाग करून, स्वतः स्काट्लंड देशास गेला. त्याचे मनांत असें होतें कीं, लोक आपलें निवारण करूं लागतील, तें निमित्त धरून आपण त्यांचें चांगलें शासन करावें; परंतु तेच होऊन त्यास नम्र झाले. त्या मुळें राजाच्या राग निष्फळ झाला; कारण कीं, जो आपणास शरण आला, त्याचा नाश करावा ही गोष्ट त्यास वाईट वाटली.

नंतर तो राजा एड्वर्ड मृत्यु पावला, तेव्हा स्काच लोक विपत्तींतून मुक्त झाले; आणि त्यांस सेवकभाव प्राप्त झायाचा होता तोही चुकला. त्यास कांहीं रोग झाल्यामुळें तो कार्लैल

गावांत होता. त्याणें आपले अंतकाळीं लेंकास सांगून ठेविलें कीं तूं स्काट्लंडाचें राज्य आपले ताबेखालीं येई तोंपर्यंत, हा उद्योग सोडूं नको. तो एकुणहात्तरावे वर्षीं सन १३०७ चे सालीं जुलै महिन्याचे सातवे तारिखेस मरण पावला. त्याणें पसतीस वर्षें राज्य केलें. त्याचे पूर्वीं किंवा पुढें जे राजे झाले त्यांतून कोणी एकानें त्याचे इतकें राज्य वाढविलें नाहीं. हा राजा मोठा होऊन गेला.

---

# प्रकरण १३

## द्वितीय एड्वर्ड राजाची कथा

## ज्याचें प्रतिष्ठानाव कोअर्नार्वन असें होतें

### सन १३०७ पासून १३२७ पर्यंत



एड्वर्ड राजा मेल्यानंतर, त्याच नावाचा त्याचा मुलगा होता, तो राज्य करूं लागला. ते समयीं त्याचें वय तेवीस वर्षांचें होतें. त्याचें रूप सुंदर, स्वभाव नम्र आणि दयाळू, आणि त्यास विशेष दुष्कर्मांची आवड नसे. असें प्रथम होतें खरें; परंतु पुढें लवकरच त्याचे बापासारिखे मोटे पुरुषानंतर राज्य करायास

१ काअर्नार्वन म्हणून वेल्स प्रांतांत एक परगणा आहे; त्यावरून या राजाचें हें नाव पडलें.

तो योग्य नव्हे, असें चिन्ह दिसों लागलें. त्यास सत्ता भोगायाची मात्र इच्छा होती, परंतु संरक्षण करायाची आस्था नसे. त्याचे दरबारांतील लोक त्याची खुशामत करीत; ती ऐकून त्यास वाटे कीं, मी राज्यपदाचा स्वीकार केला, इतक्यानेंच मोठी कीर्ति व्हाया जोगा पराक्रम केला. मरते वेळेस बापानें सांगीतलें होतें, त्याप्रमाणें त्याणें **स्काच** लोकांशीं युद्ध केलें नाहीं; ह्मणून **ब्रूसाचा** उद्योग निर्विघ्नपणें चालिला. तो **एड्वर्ड** एक वेळ **स्काट्लंड** देशास गेला होता, पण लढाईचा उद्योग करितां ह्मणून नाहीं, तर उगीच शोभार्थ.

भोळे राजांजवळ प्रीतींतले कांहीं सेवक असतात, आणि त्याणीं सांगीतल्या प्रमाणें ते ऐकतात अशी रीति आहे. त्या प्रमाणें **एड्वर्ड** राजाजवळही एक **पियर्सगेवूस्तन** ह्मणून त्याचे कृपेंतला होता; त्याचा बाप **गास्कनी** देशाचा **नैट**; जो राजाचे बापाजवळ चाकरीस

असे. राजाचा मित्र तो **पियर्स** तरुण, रूपवान्, चतुर, शूर आणि उद्योगी असा होता; तसाच दुराचरणी, बायक्या, व्यभिचारी, आणि हलकाही असे. या गुणांवर राजाची परमप्रीति होती; ह्मणून त्याचे योग्यतेस मोल नाहीं असें झालें. कांहीं दिवसांनीं **गेवस्तन** सक्तेकरून उन्मत्त होत्साता, दरबारांतील सर्व सरदारांस तुछ मानूं लागला. ह्मणून त्याचा घात करायास एक बंड उत्पन्न झालें. तें करण्यांत मुख्य **इसाबेला** राणी; आणि **लांकास्तराचा अर्ल**; जाजवळ अंमल मोठा असे; हीं दोघें होतीं.

सर्व सरदार जा कामांत एक मत झाले, आणि राणीही त्यांचे उद्योग सिद्धीस जाया करितां आंतोन सहाय असे. तेथें भोळ्या राजाचा आणि त्याचे आवडत्याचा उपाय चालला नसेल, असें सहज मनात येतें; आणि पुढें वृत्तांतही तसाच झाला. राजा बंडापासून भय आणि

संशय पावून लागलाच त्या आपले आवडत्यास आपणाजवळून काढिता झाला; परंतु मग त्यास पुनः परत बोलावून आणिला. तें पाहून सर्व सभासद युद्धास तयार झाले; त्यांत **लांकास्तराचा अर्ल** मुख्य. मग तो हतभाग्य **एड्वर्ड** राजा कोणत्या तरी उपायानें निर्भय व्हाया विषयीं उद्योग करूं लागला. त्या आपल्या आवडत्यास बरोबर घेऊन **टिन्मौथ** शहरांत गलबतावर बसून **स्कार्बरो** शहरास गेला; आणि तें निर्भय ठिकाण आपून **गेवूस्तनाला** तेथे ठेवून आपण परत **यार्कास** निघोन गेला; तेथें जाऊन शत्रूंचा प्रतीकार करायास फौज जमवावी हें, किंवा आपण तेथें असलें ह्मणजे त्यांचा क्रोध शमेल हें, या दोहोंतून एक त्याचे जाण्यास कारण असावें. त्या समयीं **पेंब्रोकाचे अर्लीनें, स्कार्बरो** शहरांत जाऊन **गेवूस्तनाला** वेढिलें; मग त्या **गेवूस्तनानें** फौज विशेष प्रबळ नाहीं, असें पाहून तहाचें बोलणें लाविलें.

कीं

कीं मला दोन महिनें पर्यंत **पेंब्रोकानें** कैदेंत ठेवावा. तितक्यांत राजाचें आणि अमात्यांचें ऐक्य व्हायाचा यत्न मी करीन. त्याणें अशो थोडे श्रमानें मुक्त व्हावें हें चांगलें न वाटून, **अर्लीनें** त्यास **बानबरी** शहराजवळ **डेडिंगतन** किल्यावर नेऊन टाकिला; आणि कांहीं दुसरे कामामुळें तो लहानशी चौकी तेथें ठेऊन आपण निघोन गेला. तें वर्तमान **वार्विक** शहरचे **अर्लाला** कळतांच त्याणें त्या किल्यावर हल्ला करून **गेवूस्तनास** आपले कैदेंत ठेविलें. मग **लांकोस्तर, हर्फोर्ड** आणि **आरंदल** शहरचे **अर्लीस** ही गोष्ट समजतांच, ते एकत्र जमा होऊन त्यास काय शासन करावें याचा विचार करूं लागले. हा विचार करायास बहुत वेळ न लागतां, लागलेंच सर्व संमतानें ठरलें कीं, तो सर्व राज्याचा शत्रु म्हणून त्यास ठार मारावें. मग त्यास **ब्लाकलोहिल** या नावाचे स्थानीं नेऊन त्याचा शिर-

छेद केला.

थोडे दिवसांनंतर **बानिकबर्न** नामक मैदानांत **ब्रूसाचे** फौजेपासून **एडवर्ड** राजा केवळ पराजय पावला, हें त्यास अधिक दुःख झालें. नंतर आपले मनास कांहीं विश्रांति व्हावी, म्हणून त्याणें दुसरे एके पुरुषाशीं मैत्री केली. त्या पुरुषाचें नाव **ह्युडि स्पेनसर** होतें. तो मोठ्या कुळांतला, आणि त्याचा स्वभाव मैत्रीला फार चांगला असे. त्यापेक्षें त्याचा बाप अधिक गुणी, वयानें पूज्य होता; तसाच चातुर्य, शूरत्व, आणि शुद्धता या गुणें करून स्तुत्य असे; परंतु त्यावर आणि त्याचे मुलावर राजाची कृपा झाल्यापासून या सर्व गुणांचा कांहीं उपयोग न होतां त्याचें अकल्याण मात्र झालें. तें असें; राजानें आपले मित्रांस द्याया करितां कितिएक मोट मोटे **लार्ड** होते, त्यांचा संपत्ति कांहीं कारणावांचून काढून घेतल्या. हें निमित्त राजाचे शत्रू फार दिवस वाट पहात

हात होते त्यांस सांपडलें. त्यांणीं पार्लमेंटा-पासून असा हुकूम करविला कीं, त्या दोघे बाप लेंकांस दरबारांतून काढून द्यावे, आणि त्यांचीं घरेंदारें जप्त करावीं. त्या समयीं राजानें सुस्तपणा सोडून आपले आवडते स्पेन्सरा-चे संरक्षणा करितां युद्ध करायाचा निश्चय केला. तो तीस हजार लोक घेऊन लांका-स्तर शहराचा अर्ल होता, त्याचे इतका न-जीक जाऊन पोहोंचला कीं, अर्लास आप-ली फौज जमा करायास वेळ सांपडला नाहीं. मग तो वाट सांपडेल तिकडे पळूं लागला; शे-वटीं त्यास राजाचा सरदार सर आंद्रुहार्क्लीम्ह-णून होता त्याणें स्काट्लंडाचे वाटेवर धरू-न कैदेंत ठेविला. या गृहस्थानें पूर्वीं गेवस्त-नावर थोडीच दया केली होती, म्हणून या प्रसंगीं त्यासही विशेष क्षमा प्राप्त झाली ना-हीं. हें असेंच आहे, द्यावें तसें घ्यावें. मग

कोर्टमार्शल करून त्याचें शासन ठरविलें, आणि एके मरतुकडे घोड्यावर बसवून पामफ्रट शहराजवळ उंच ठिकाणीं नेऊन तेथें त्याचा शिरच्छेद केला.

तें बंड या रीतीनें मोडलें, तेणेंकरून त्या स्पेन्सरास अभिमान आणि लोभ अधिक उत्पन्न झाला. पुष्कळांच्या संपत्ति जप्त करून त्याणें आपले खासगी कडे लाविल्या; आणि राजाच्या जाणीं द्वेष केला होता, त्यांचें शासन करायाच्या निमित्तानें त्याणें बहुत अन्याय कर्में केलीं. त्याचें आणि राणीचें वैर पडलें. ती राणी आग्रही आणि दुष्ट असे. राजाजवळून स्पेन्सर निघोन राज्याचे पार जाईल, त्या वेळेस मी इंग्लंडांत पाय ठेवीन, अशी प्रतिज्ञा करून ती राणी फ्रान्स देशास निघोन

---

१ लढाई खात्यांतील लोकांचे अपराधांची चौकशी करून शासन ठरवाया करितां, त्या प्रकरणींचे कामगार लोकांची सभा होत्ये तिचें नाव कोर्टमार्शल.

गेली

गेली. इंग्लंडांतील सर्व लोकांची स्पेनसरा-वर गैरमर्जी होती, ह्मणून हें राणीचें कर्म पाहून ते तिची प्रशंसा करूं लागले. ती इसाबेला राणी एक मार्टिमर ह्मणून मोठा गृहस्थ होता, त्याशीं आनंदानें सुख भोगीत असे; ह्मणून तिचें दरबार जे जे राजाचे प्रतिपक्षी होते त्यांस आश्रय झालें. नंतर थोडे दिवसानीं लढायास सिद्ध अशी तीन हजार फौज बरोबर घेऊन. ती डोर्ड बंदरांतून निघोन सफोक प्रांताचे कांठीं येऊन निर्विघ्नपणें उतरली. ती तेथें येतांच सर्व लोक तिला अनुकूळ झाले; तेव्हां त्या हतभाग्य राजास समजलें कीं, राज्यांत कोणाची आपणावर भक्ति राहिली नाहीं. ब्रिस्तलाचे किल्यांत मोठ्या स्पेन्सराचे हाताखालीं लोक होते, त्यां वर राजानें कांहीं भरंवसा ठेविला होता; परंतु त्याणीं फितुर होऊन आपले मुख्यास धरून दिला. त्यास अन्यायानीं मोठ्या निर्दयपणानें मारिलें. त्याचे

आंगावर

आंगावर कवच असतां त्यास फाशीं दिला; शरीर कापून तुकडे करून कुतऱ्यास घातलें डोकें विंचेस्तरास पाठविलें; आणि तेथें तें एके काठीस लावून लोकांचे मौजे करितां ठेविलें.

त्याचा मुलानेंही त्याचा मागें बहुत दिवस प्राण ठेविले नाहीं. वेल्स प्रांतांत एके मठांत राजा आऊन राहिला होता, तेथें त्याबरोबर तो आणि दुसरे कितिएक गेले होते ते सर्व धरिले गेले; मग त्या निर्दय अमात्यांनीं त्याचे हालहाल करून आपला राग शांत करायाचा निश्चय केला. त्यांची रीति प्रमाणें उघड चौकशी होई पर्यंत वाट नपाहतां राणीनें हुकुम केला कीं, स्पेनसराला रस्त्यानें धिंड काढीत फिरवावा. त्याची विपत्ति पाहून जो दुष्ट आनंद होणार तो भोगायाची तिणें इछा केली. त्यास माराया करितां पन्नास फुट उंच सूळ उभा केला; त्या सुळावर त्यास देऊन, त्याचें डोकें लंडन शहरास पाठविलें; तेथें लोकांनीं तें मोठे आ-

नंदानें

नंदानें घेऊन पुलावर लाविलें. कितिएक दुसरे लार्डांची अवस्था तशीच झाली. त्या सर्वांनीं पूर्वी जर आपण दुष्कर्मे करून मार्ग दाखविला नसता, तर ते कृपा करायास योग्य होते.

त्या वेळेस राजा वेल्स प्रांतांत दडून होता; तो तेथें आहे असें समजतां त्यास धरून, लोक शिव्या देताहेत, नाना प्रकारच्या चेष्टा करिताहेत, अशा समारंभानें लंडन शहरास नेला; आणि किल्यावर ठेविला. नंतर त्यावर असा दोष आणिला कीं, त्यास राज्य करायास सामर्थ्य नाहीं; तो आळशी, आणि स्व्याली खुशालींत निमग्न; तसाच लबाड मंत्री सांगतात तसें ऐकतो. हे दोष ठरवून त्यास पदच्युत करावा ही गोष्ट पार्लमेंटाचे संमतीस आली. मग त्याचे उपजीविके करितां कांहीं स्वास्थ्य करून दिलें. आणि त्याचा पुत्र एड्वर्ड चवदा वर्षांचा होता त्यास राज्यप-

दावर स्थापिला. तो मोठा होईपर्यंत कामकारभार राणीनें चालवावा असें ठरविलें.

अशी विपत्ति प्राप्त झाल्यावर, राजा फार दिवस वांचला नाहीं. तो ज्यांचे स्वाधीन होता, ते त्यास आपले मर्जी प्रमाणें या बंदिखान्यांतून त्या बंदिखान्यांत असा फिरवीत. त्याची अवस्था त्या वेळेस एकादा ज्ञाति बहिष्कृत असतो, तशी झाली होती. प्रथम तो **लांकास्तराचे अर्लोचे** कैदेंत होता; परंतु कृपेनें तो त्याच्या किंचित् मान राखूं लागला, म्हणून त्या कडून काढून त्यास **लार्डबर्किली, मांत्रावर्स** आणि **गुर्ने** यांचे स्वाधीन सुमारें एक महिनापर्यंत केला. **लार्डबर्किलीनें** त्यास कसें काय सुख दुःख दिलें असेल तें असो; परंतु दुसऱ्या दोघांनीं त्याला निर्दयपणें फारच छळिलें. ते हाल भोगून त्याणें लवकर मरावें असेंच त्यांचे मनांत होतें असेल. म्हणून दुसरीं त्याणीं बहुत प्रकारचीं कंटाळवा-

णीं कर्मे केली. त्यांत एक असें सांगतात कीं, त्यास एकें शेतांत बसवून तेथील खाड्यांतलें पाणी घेऊन त्याची मौजेनें हजामत करविली. पूर्वीं जीं त्याणीं दुःखें दिलीं होतीं, त्यांपासून त्यास वाईट वाटलें नव्हतें; परंतु त्याप्रसंगीं त्यास तें साहवेना असें झालें. त्यावेळेस त्याचे नेत्रांतून अश्रुपात येऊन तो, त्यांजवळ संतापानें पाहून बोलिला कीं, कांहीं चिंता नाहीं; कधींतरी असा दिवस येईल कीं, मी इतकें दुःख पावणार नाहीं. परंतु ही त्याची आशा व्यर्थ झाली. ती अशी; त्याचे शत्रूंनी पाहिलें कीं, कसें दुःख दिलें तरीं त्यास मृत्यु लवकर येत नाहीं; म्हणून त्याणीं त्यास तत्क्षणीं माराव्याचा निश्चय केला. मग त्याचे दोन शत्रु **गुर्ने** आणि **मांत्रावर्स** हे, तो जा **बर्क्लि** किल्ल्यांत होता तेथें गेले. त्याणीं असा बेत केला कीं, त्याचे शरीरावर कांहीं खूण झाल्या वांचून त्यास मारावें. मग त्यास पलंगावर पाडून त्याचे शरीरावर एक मेज ठेविलें. आणि त्याचे पो

टांत

टांत एक नळी ठेवून त्यांतून तापलें लोखंड ओतिलें. त्यांस असें वाटलें कीं, अशा कार्यानें आपला अपराध लपला जाईल; परंतु तो मोठ्यानें भयंकर ओरडला, तें किल्याबाहेर दूर ऐकायास गेलें; आणि या रीतीनें त्या खुनाचा शोध लागला. एडुर्ड राजा सारिखी विपत्ति पाहून दया उत्पन्न व्हावीच; आणि त्याणें जीं कांहीं दुष्कर्में केलीं असतील, तीं त्याचा असा घोर परिणाम पाहून मनांतून जावीं.

# प्रकरण १४

## तृतीय एड्वर्ड राजाची कथा

सन १३२७ पासून १३७७ पर्यंत



जा पार्लमेंटाचे आश्रयानें एड्वर्ड आपला बाप असतां राज्य पावला, त्या सभेनें राज्यांतला कारभार चालवाया करितां बारा आसामी त्याचे मुख्य मंत्री नेमिले. राणीचा मित्र जो मार्टिमर त्याची त्यांत नेमणूक व्हावी; परंतु त्याणें साधेपणाचा डौल करून आपणच नको म्हटलें. तथापि ते मंत्री जें काय करीत तें आंतून त्याचा मर्जी प्रमाणें करीत असत. त्याणें जमाबंदीचा बहुत करून वसूल त्या विधवा राणीला मिळावा असें केलें. तो कांहीं मोटे राज्याचे कामाविषयीं कधींही मंत्र्यांशीं मसलत-